**स्व.यशवंतराव चव्हाण राज्य वाड्.मय पुरस्कार योजने अंतर्गत परीक्षण समिती गठित करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## मराठी भाषा विभाग

**शासन निर्णय क्रमांकः रावापु-१०१४/प्र.क्र.२३/२०१४/भाषा-३,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

**तारीख: १० सप्टेंबर, २०१४.**

वाचा :-

१. मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र.रावापु-१०१२/प्र.क्र.१०४/२०१२/भाषा-३, दिनांक ०४ जानेवारी, २०१३.
२. मराठी भाषा विभाग, शुध्दीपत्रक क्र.रावापु-१०१२/प्र.क्र.१०४/२०१२/भाषा-३, दिनांक १२ फेब्रुवारी, २०१३.
३. मराठी भाषा विभाग, शासन ज्ञापन क्र.रावापु-१०१४/प्र.क्र.२३/२०१४/भाषा-३, दिनांक २४ मार्च, २०१४.

**प्रस्तावना :-**

उत्कृष्ट मराठी वाड्.मय निर्मितीस राज्य पुरस्कार (नविन नामकरण स्व.यशवंतराव चव्हाण राज्य वाड्.मय पुरस्कार) योजनेअंतर्गत साहित्याचे परिक्षण करुन पारितोषिकांसाठी शिफारशी करण्याकरिता अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ यांच्या अध्यक्षतेखाली गठित करण्यात आलेल्या परिक्षण समिती बाबतचे संदर्भाधीन दिनांक ०४ जानेवारी, २०१३ व दिनांक १२ फेब्रुवारी, २०१३ चे शासन निर्णय अधिक्रमित करुन वेळोवेळी परीक्षण समिती गठित करण्याबाबतचे पूर्ण अधिकार महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळास देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

या शासन निर्णयान्वये स्व.यशवंतराव चव्हाण राज्य वाड्.मय पुरस्कार या योजनेअंतर्गत पुरस्कार प्रदान करण्यासाठी साहित्याचे परीक्षण करुन पारितोषिकांसाठी शिफारशी करण्याकरीता अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य साहितय आणि संस्कृती मंडळ यांच्या अध्यक्षतेखाली, अध्यक्षांच्या सहमतीनुसार परीक्षण समितीवरील परिक्षकांची निवड करुन वेळोवेळी परीक्षण समिती गठीत करण्याचे पूर्ण अधिकार खालील अटींच्या अधीन राहून महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळास प्रदान करण्यात येत आहेत.

१. प्रत्येक वर्षी स्व.यशवंतराव चव्हाण राज्य वाड्.मय पुरस्कार योजनेअंतर्गत एकूण किती प्रवेशिका प्राप्त झाल्या, नियमानुसार किती प्रवेशिका कोणत्या कारणास्तव रद्द ठरविण्यात आल्या या बाबतचा वाड्.मय प्रकार निहाय व पुरस्कार निहाय तपशील मंडळाने, विहित कालावधीत प्रवेशिकांची छाननी प्रक्रिया पूर्ण झाल्यावर लगेच शासनास सादर करावा.

कृ.मा.प.

२. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ यांच्या अध्यक्षतेखाली गठित करण्यात आलेल्या परिक्षण समितीमधील परीक्षकांची यादी दरवर्षी (पूर्वीच्या परीक्षण समितीमध्ये बदल असो वा नसो) परीक्षण समिती नेमल्यावर लगेचच शासनास सादर करणे बंधनकारक राहील.

३. ज्या वर्षी ज्या लेखकाचे पुस्तक स्पर्धेसाठी मंडळाकडे प्राप्त झाले असेल त्या वर्षी त्या संबंधित लेखकाची नियुक्ती परीक्षण समितीमध्ये केलेली नसावी.

२. परीक्षण समितीवरील परिक्षकांना वित्त विभागाच्या क्र.प्रवास-१०१०/प्र.क्र.२/सेवा-५, दिनांक ०३ मार्च, २०१० व क्र.बैठक-२०१२/प्र.क्र.१/सेवा-५, दिनांक २४ मे, २०१० च्या शासन निर्णयानुसार प्रवास भत्ता व बैठक भत्ता अनुज्ञेय राहील.

३. यासाठी सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या दुय्यम अधिकाऱ्यास याबाबतच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. याप्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडएफ-०२, २२०५, कला व संस्कृती (००) १०२ कला व संस्कृती प्रचालन, (०१) योजनेतर योजना (०१) (०३) उत्तम पुस्तकांना उत्तेजन (२२०५ ३१९९) - ५० इतर खर्च (योजनेतर)" या लेखाशिर्षाखाली मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०११४१४३८७२३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vrushali Vasant Sawant

Digitally signed by Vrushali Vasant Sawant
DN: c=IN, o=Goverment of Maharashtra, ou=Marathi Language Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vrushali Vasant Sawant
Date: 2014.09.10 11:23:58 +05'30'

**( वृषाली व. सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
३. महालेखापाल, महाराष्ट्र - १ / २, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई / नागपूर,
४. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई,
५. सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई (२ प्रती),
६. धारीका क्र.रावापु-१०१२/प्र.क्र.१०४/२०१२/भाषा-३,
७. **निवड नस्ती (भाषा-३).**